**याचिकाकर्ते सर्वश्री. गणपतराव छोटूजी गभने व इतर १३ विरुध्द महाराष्ट्र शासन (रिट याचिका क्रमांक १८६८/२००५) प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांच्या दि. १४.०६.२०१७ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार कार्यवाही करणेबाबत.**

**जिल्हा - धुळे**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक संकिर्ण१९२३/प्र.क्र.३७/स्वासैक-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २८ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. शासन निर्णय क्रमांक, संकीर्ण-२००५/प्र.क्र.१४१/२००५(२०१७)/स्वासैक-१, दिनांक ६.३.२०१८.

२. शासन निर्णय क्रमांक, संकीर्ण-२००५/प्र.क्र.१४१/२००५(२०१७)/स्वासैक-१, दिनांक १३.३.२०१९.

३. अपर उपजिल्हाधिकारी, धुळे यांचे पत्र क्र./ड/कक्ष/३/एमएजी-१/कावी/४५०, दि.०८.०९.२०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने गोवा मुक्ती संग्रामातील स्वातंत्र्य सैनिकांना केंद्र शासनाचे सन्मान निवृत्तीवेतन पूर्वलक्षी प्रभावाने मंजूर केल्याने, ज्या स्वातंत्र्य सैनिकांना केंद्र शासनाचे स्वातंत्र्य सैनिक सन्मान निवृत्तीवेतन मंजूर झाले होते, त्यांना त्या दिनांकापासून राज्य शासनाची पूर्ण पेंन्शन देण्याऐवजी दरमहा रु.५००/-प्रमाणे अतिरिक्त सन्मान निवृत्तीवेतन देण्यात यावे असे आदेश दि.१६.११.२००४ रोजीच्या शासन पत्रान्वये देण्यात आले होते.

२. दि.१६.११.२००४ रोजीच्या शासन आदेशाच्या विरोधात सर्वश्री. गणपतराव छोटूजी गभणे व इतर १३ (जिल्हा नागपूर ९, यवतमाळ ४, व वर्धा १) यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर येथे रिट याचिका क्र.१८६८/२००५ दाखल केली होती. याप्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांनी दि.१४.०६.२०१७ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयाची अंमलबजावणी करण्याची कार्यवाही विविध शासन निर्णयान्वये करण्यात येत होती. तथापि, मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांचा दि.१४.०६.२०१७ रोजीच्या न्यायनिर्णयाची पूर्णत्वाने अंमलबजावणी करण्याकरिता मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे अवमान याचिका क्र.५३१/२०१८ दाखल करण्यात आली. तद्नंतर संदर्भ क्र.२ येथील दिनांक १३.०३.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये, मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांचा दि.१४.०६.२०१७ रोजीचा न्यायनिर्णय हा सर्वच समान प्रकरणी लागू करण्यात आला आहे. सदर तरतुदीनुसार निवृत्तीवेतनाची थकबाकी अदा करण्यासाठी वेळोवेळी विविध शासन निर्णयान्वये संबंधित जिल्हाधिकारी यांना निधी वितरित केला आहे.

३. आता, अपर उपजिल्हाधिकारी, धुळे यांनी संदर्भ क्र. ३ येथील दि.०८.०९.२०२३ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासन स्वातंत्र्य सैनिक निवृत्तवेतनधारक कै.श्री.मिठाराम गिरासे यांच्या पत्नी कै.श्रीमती केशरबाई मिठाराम गिरासे यांचे दि.०२.०९.२०२१८ रोजी निधन झाल्यामुळे त्यांचे कायदेशीर वारस श्री.जगन्नाथ मिठाराम गिरासे (मुलगा) यांना दि.१३.०३.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०६.२००४ ते दि.०२.०९.२०१८ या कालावधीतील निवृत्तीवेतन फरकाची रु.१०,९३,०००/- इतकी रक्कम अदा करण्याकरिता अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत विनंती केली आहे. त्यासंदर्भातील तपशील खालीलप्रमाणे आहे:-

| अ. क्र. | स्वातंत्र सैनिक पती/पत्नी चे नाव | कायदेशीर वारसाचे नाव | थकबाकी कालावधी | थकबाकी रक्कम (रु.) |
|---|---|---|---|---|
| | | **धुळे जिल्हा** | | |
| १ | कै. श्रीमती केशरबाई मिठाराम गिरासे | श्री. जगन्नाथ मिठाराम गिरासे (मुलगा) रा. वरूळ ता. शिंदखेडा, जि. धुळे | दि.०१.०६.२००४ ते ०२.०९.२०१८ | १०,९३,०००/- |
| | | | **एकूण** | **१०,९३,०००** |

उपरोक्त पार्श्वभूमीवर न्यायालयीन निर्णयाची पूर्णत्वाने अंमलबजावणी होण्याकरिता जिल्हाधिकारी, धुळे यांना निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

याचिकाकर्ते सर्वश्री. गणपतराव छोटूजी गभने व इतर १३ विरुध्द महाराष्ट्र शासन (रिट याचिका क्रमांक १८६८/२००५) प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांच्या दि.१४.०६.२०१७ रोजीच्या न्यायनिर्णयाची पूर्णत्वाने अंमलबजावणी होण्याच्या अनुषंगाने, जिल्हाधिकारी कार्यालय, धुळे यांचेकडून प्राप्त प्रस्तावानुसार, केंद्र शासन स्वातंत्र्य सैनिक निवृत्तवेतनधारक कै.श्री.मिठाराम गिरासे यांच्या पत्नी कै. श्रीमती केशरबाई मिठाराम गिरासे यांचे कायदेशीर वारस श्री.जगन्नाथ मिठाराम गिरासे (मुलगा) यांना दि.०१.०६.२००४ ते दि.०२.०९.२०१८ या कालावधीतील देय असलेली रु.१०,९३,०००/- (अक्षरी-दहा लाख त्र्याण्णव हजार फक्त) इतकी थकबाकी प्रदान करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधी जिल्हाधिकारी, धुळे यांना अदा करण्यासाठी सहसचिव/उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, स्वातंत्र्य सैनिक कक्ष, मंत्रालय, मुंबई (A0013) हे नियंत्रक अधिकारी राहतील.

३. जिल्हाधिकारी, धुळे यांनी विहित कार्यपद्धतीचा अवलंब करुन, वरील स्वातंत्र सैनिक यांच्या कायदेशीर वारसास अनुज्ञेय थकबाकी प्रदान करण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. जिल्हाधिकारी, धुळे यांनी खर्च केलेल्या अनुदानाच्या रकमांचा ताळमेळ महालेखापाल-१, मुंबई/महालेखापाल-२ नागपूर यांचेकडे विहित कालावधीत करुन खर्चमेळाचा मासिक अहवाल शासनास त्वरित सादर करावा.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च “मागणी क्र.ए-५, प्रधान लेखाशिर्ष-२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण (६०) इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम (१०२) सामाजिक सुरक्षा योजना (००) (०१) स्वातंत्र्य सैनिक व त्यांच्यावर अवलंबून असलेल्या व्यक्ती इत्यादींना निवृत्तीवेतन (अनिवार्य) ०४, निवृत्तीवेतनविषयक खर्च (२२३५ ००१५)” या अर्थसंकल्पीय लेखाशीर्षाखाली चालू आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्र. २०२४०३२८१५५७१८२९०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KISHOR BALIRAM NANVARE

Digitally signed by KISHOR BALIRAM NANVARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=fe999a6df0afb3cbcb04011b094c0c03933b517a839feb4c64184c7f85f5adb9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2C5D8A2C16BC0D3779E84FEFC316A16497391C87251547B9A0338E4A70D535BD, cn=KISHOR BALIRAM NANVARE
Date: 2024.03.28 16:07:13 +05'30'

**( किशोर ब. ननवरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १, मुंबई / नागपूर
२. महालेखापाल ( लेखापरिक्षा ), महाराष्ट्र १, मुंबई / नागपूर
३. अपर मुख्य सचिव (वि.चौ.अ.१) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२,
४. जिल्हाधिकारी, धुळे.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, धुळे
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८. कक्ष अधिकारी (का.२५), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (अर्थसंकल्प १४/व्यय-४) मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती ( स्वा.सै.क.१)